**महाराष्ट्र शासन**

क्रमांक : गौखनि -३३/१०१२/प्र.क्र.६०६/ख

महसूल व वन विभाग
हुतात्मा राजगुरू चौक,
मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : ३०/०१/२०१९.

**विषय : गौण खनिज-अहमदनगर**

सन २०११-१२ या वर्षाकरिता मौजे वाघापूर, ता. संगमनेर या वाळूगटाची शासनजमा केलेली १/४ रक्कम परत करणेबाबत.
श्री. शिवाजी खंडू शिंदे.

शासन ज्ञापन महसूल व वन विभाग क्र. गौखनि ३३/१०१२/प्र.क्र. ६०६/ख, दि. २८.३.२०१८ निरसित करण्यात येवून सुधारित ज्ञापन खालीलप्रमाणे :-

**शासन ज्ञापन:**

जिल्हाधिकारी अहमदनगर यांना उपरोक्त विषयावरील त्यांचे पत्र क्र.गौख/कार्या ४क/१७०४/२०१२ दि. १६.११.२०१२ च्या पत्रास अनुलक्षून असे कळविण्यात येते की, सन २०११-१२ करिता अहमदनगर जिल्हयातील मौजे वाघापूर, ता. संगमनेर हा ४५०० ब्रासचा वाळूगट श्री. शिवाजी खंडू शिंदे यांना सर्वोच्च बोलीने मंजूर करण्यात आला होता. लिलावधारकाने लिलावाची ¼ रक्कम रु. २८,९५,०००/- दि. १७.१२.२०११ रोजी शासनजमा केली होती. तथापि, ग्रामस्थ व ग्रामसभेच्या विरोधामुळे लिलावधारक यांनी उर्वरित रक्कम शासनजमा केली नाही. त्यामुळे, जिल्हाधिकारी अहमदनगर यांनी वाळू/रेती निर्गती धोरणासंबंधीच्या दि. २५.१०.२०१० च्या शासन निर्णयातील परिच्छेद A१२(iii) व C७ तसेच लिलावाच्या जाहीर निविदा सूचनेतील अट क्र. ७ नुसार, आदेश क्र. गौख/कार्या-४ क/८८/२०१२ दि. १६.१.२०१२ च्या आदेशान्वये लिलावधारकाची १/४ रक्कम जप्त करून लिलावधारकास काळ्या यादीत टाकले.

२. सदर आदेशाविरूध्द लिलावधारकाने शासनाकडे अपील केले असता, तत्कालीन मा. राज्यमंत्री (महसूल) यांनी दि. १७.७.२०१४ च्या आदेशान्वये जिल्हाधिकारी अहमदनगर यांचे दि. १६.१.२०१२ चे आदेश रद्द केले. तसेच, अर्जदाराने शासनजमा केलेली ¼ रक्कम परत करण्याबाबत महसूल विभागाने कार्यवाही करावी, असे आदेश दिले आहेत. त्याअनुषंगाने, मौजे वाघापूर, ता. संगमनेर या वाळूगटाच्या लिलावधारकाने शासनजमा केलेली १/४ रक्कम रु. २८,९५,०००/- परत करण्याबाबत दि.२८/०३/२०१८ च्या शासन ज्ञापनान्वये जिल्हाधिकारी, अहमदनगर यांना कळविण्यात आले होते. तथापि, दि.३१/०३/२०१८ रोजी कोषागार कार्यालय, अहमदनगर यांचेकडील देयक प्रणाली बंद झाल्याने सदर देयक संबंधितांस पारित करता आले नसल्याचे जिल्हाधिकारी कार्यालय अहमदनगर यांनी त्यांच्या दि.०९/०४/२०१८ च्या पत्रान्वये शासनास कळविले होते. सदर देयक २०१८-१९ या आर्थिक वर्षामधील उपलब्ध तरतूदीतून सदर रकमेचा परतावा करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

३. सबब, लिलावधारक श्री. शिवाजी खंडू शिंदे यांना रु. २८,९५,०००/- **(रुपये अठ्ठावीस लाख पंच्याण्णव हजार फक्त)** इतकी रक्कम, त्यांनी लिलावाची रक्कम प्रत्यक्षात शासनाकडे जमा केल्याची व यापूर्वी ही रक्कम अदा केलेली नाही याची खातरजमा करुन घेण्याच्या अटीवर अदा करण्यास या शासन ज्ञापनाद्वारे शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

४. याबाबीवर होणारा खर्च सन २०१८-१९ यावर्षाकरीता लेखाशिर्ष, "०८५३ - अलोहयुक्त खाणी व धातुशास्त्रीय उद्योग "१०२ - खनिजबाबत सवलत फी व स्वामित्वधन, ९००, अलोहयुक्त खाणकाम व धातुशास्त्रीय उद्योग - वजा परतावे (००) (०१) वजा परतावे (०८५३ ००८६)" खाली उपलब्ध असलेल्या अंदापत्रकीय तरतूदीमधून खर्ची टाकून भागविण्यात यावा.

५. सदर ज्ञापन वित्त विभागाच्या सहमतीने त्या विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक २१०/२०१८/व्यय-९, दिनांक ११.५.२०१८ अनुसार दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९०१३०१६३९२०८२१९ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने.

Dinesh Rohidas Chavan

Digitally signed by Dinesh Rohidas Chavan
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c0edee7a8805e86e41846cf28cf151b9ce48bb88ebf4f2e8a7fc10e8dcad98ec, serialNumber=8c2377ed235498603821d49922a210871ff6fb9b369722ac707aee7dcd87f2bd, cn=Dinesh Rohidas Chavan
Date: 2019.01.30 16:50:50 +05'30'

**(दिनेश चव्हाण)**
अवर सचिव
महसूल व वन विभाग

**प्रति,**

जिल्हाधिकारी अहमदनगर, अहमदनगर.

**प्रत:**

१) विभागीय आयुक्त, नाशिक विभाग, नाशिक.
२) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, प्रतिष्ठा भवन, १०१, महर्षि कर्वे भवन, न्यू मरीन लाईन्स, मुंबई - ४०० ०२०.
३) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, प्रतिष्ठा भवन, १०१, महर्षि कर्वे भवन, न्यू मरीन लाईन्स, मुंबई- ४०० ०२०.
४) जिल्हा कोषागार अधिकारी अहमदनगर, अहमदनगर.
५) वित्त विभाग, (व्यय-९/ अर्थसंकल्प -३/६/१४ कार्यासने) मंत्रालय, हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग, मुंबई -४०० ३२.
६) कार्यासन अधिकारी (ब-१ कार्यासन) महसूल व वन विभाग, मंत्रालय, हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग, मुंबई -४०० ३२.
७) निवडनस्ती "ख" कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग, मुंबई -४०० ३२.